**आदिवासी उपयोजना क्षेत्रातील योजनांचा/ कार्यक्रमांचा आढावा घेण्यासाठी प्रकल्प स्तरीय (नियोजन आढावा) समितीची स्थापना.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक प्रकल्प-२०२०/प्र.क्र.३/का.३.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २४ जानेवारी, २०२०.

**वाचा :-**

(१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक टीएसपी-१९९२/प्र.क्र.१३(१)/का.६, दि.११.०२.१९९३.

(२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक टीएसपी-१०९९/प्र.क्र.२७/का.६, दि.१९.०६.१९९९.

(३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रकल्पस्तरीय-२०१६/प्र.क्र.१२२ (भाग-३)/का.३, दि. २६.०३.२०१८, १०.०७.२०१८, १४.११.२०१८, २२.०२.२०१९, ०८.०३.२०१९, १५.०६.२०१९.

**प्रस्तावना :-**

प्रस्तावनेतील अ.क्र.१ मधील शासन निर्णयान्वये आदिवासी उपयोजना क्षेत्रातील योजनांचा/कार्यक्रमांचा आढावा घेण्यासाठी २९ एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पांच्या कार्यक्षेत्रासाठी प्रकल्पस्तरीय नियोजन आढावा समितीची स्थापन करण्याची तरतूद करण्यांत आली आहे.

संदर्भिय क्र.३ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील आदिवासी जिल्हयांमध्ये आदिवासी विकास प्रकल्प क्षेत्रातील आदिवासी उपयोजना क्षेत्रातील योजना/कार्यक्रमांचा आढावा घेण्यासाठी प्रकल्प स्तरीय (नियोजन) समित्यांवर अध्यक्ष व अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यांत आली होती.

आदिवासी विकास विभागांतर्गत प्रकल्पस्तरीय जुन्या समितींना तात्काळ रद्द करुन नवीन प्रकल्प समितीची नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भिय अ.क्र.३ मधील शासन निर्णयान्वये सर्व २९ एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पांसाठी स्थापन करण्यात आलेल्या प्रकल्पस्तरीय नियोजन आढावा समित्यांवरील अध्यक्ष व सर्व अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या या शासन निर्णयान्वये रद्द करण्यांत येत आहेत.

सर्व संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी उपरोक्त आदेश प्रकल्प स्तरीय (नियोजन) समित्यांवर अध्यक्ष व अशासकीय सदस्य यांच्या निदर्शनास आणावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक २०२००१२४१६१२५४२४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lalitkumar
Rangnath Dhaygude

Digitally signed by Lalitkumar Rangnath Dhaygude
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77ee43feb646b7ae43865425ca1d67a75cd7607faeae62a4e9bad488155d6d28, serialNumber=84e88a84c7d5fa8833ba5d3a151caf394d94599c220a07bdd761a398eed0ac3e, cn=Lalitkumar Rangnath Dhaygude
Date: 2020.01.24 15:51:03 +05'30'

**( ललितकुमार धायगुडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
३. सर्व संबंधित अध्यक्ष, उपाध्यक्ष व शासकीय सदस्य द्वारा : संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
७. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
८. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
९. आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने.
१०.निवडनस्ती, कार्यासन-३.